**स्व. वसंतराव नाईक, माजी मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांच्या जन्मशताब्दी वर्षा निमित्त वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर येथील परिसरात महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री स्व. वसंतराव नाईक यांच्या नावाने सुसज्ज सभागृह बांधण्यासाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत व निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.९७/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ ऑक्टोंबर, २०१८

वाचा-

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१२/प्र.क्र. ३१९/३अे, दि. २० फ़ेब्रुवारी, २०१४
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१२/प्र.क्र. ३१९/३अे, दि. ३ मार्च, २०१४
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१२/प्र.क्र. ३१९/३अे, दि. ३० मार्च, २०१४
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं -२०१८/प्र.क्र६९/अर्थ -३, दि.२ एप्रिल,२०१८
५) संचालक,वनामती,नागपूर यांचे पत्र क्र.वनामती/बांधकाम/१३९१/२०१८, दि. २६.०४.२०१८
६) संचालक,वनामती,नागपूर यांचे पत्र क्र.वनामती/बांधकाम/३०२७/२०१८, दि. ०१.१०.२०१८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री स्व. वसंतराव नाईक यांच्या जन्मशताब्दी वर्ष (दिनांक ०१.०७.२०१२ ते दिनांक ३०.०६.२०१३) निमित्त वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर येथील परिसरात ३१७ व्यक्ती बसू शकतील असे सुसज्ज सभागृह बांधण्याचा निर्णय घेण्यात आला होता. उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रस्तुत सुसज्ज सभागृहाचे बांधकाम करण्यासाठी रु. ४,९९,२९,९८२/- रकमेच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करताना सन २०१२-१३ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. प्रस्तुत सभागृहाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यात आल्यानंतर सविस्तर अंदाजपत्रक सन २०१४-१५ च्या दरसूचीनुसार तयार करण्यात आले असल्याचे संचालक, वनामती यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये कळविले होते. सदर दरसूचीतील फरकामुळे सभागृहाच्या बांधकाम खर्चामध्ये वाढ झाली आहे. तसेच सदर सभागृहाचे बांधकाम पुर्ण झाले असल्याने प्रस्तुत सभागृहाच्या बांधकामासाठी सुधारित कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्याची व त्या अनुषंगाने उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तदनुसार शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१ स्व. वसंतराव नाईक, माजी मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांच्या जन्मशताब्दी वर्ष (दिनांक ०१.०७.२०१२ ते दिनांक ३०.०६.२०१३) निमित्त वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर येथील परिसरात महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री स्व. वसंतराव नाईक यांच्या नावाने ३१७ व्यक्ती बसू शकतील असे सुसज्ज सभागृह बांधण्यासाठी रु. ६,२६,०२,०८३ ( रुपये अक्षरी सहा कोटी सहव्वीस लक्ष दोन हजार त्र्याऐशी फ़क्त) किंमतीस कार्योत्तर सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. मुळ व सुधारित प्रशासकीय मान्यतेचा सविस्तर बाबनिहाय गोषवारा सोबत जोडलेल्या “प्रपत्र अ” प्रमाणे आहे.

२ वनामती नागपूर परिसरातील सभागृहाच्या बांधकामासाठी यापूर्वीच संदर्भाधीन क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये एकुण रु. ४९९ लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. सबब उर्वरित रु.१२७ लक्ष ( रुपये अक्षरी एक कोटी सत्तावीस लक्ष ) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३ प्रत्यक्ष निधी खर्चासाठी उपलब्ध करताना वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे पालन करावे. व याबाबत खात्री करुन तसे प्रमाणित करावे. व त्यानंतर प्रत्यक्ष निधी खर्चासाठी उपलब्ध करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

४ मंजुर केलेला रु.१२७.०० लक्ष (रू. एक कोटी सत्तावीस लक्ष फक्त) निधी खर्च करण्यास संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी मंजूर केलेला निधी वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर यांचेकडे हस्तांतरित करण्याबाबतची कार्यवाही करावी. मंजुर करण्यात आलेला रु.१२७.०० लक्ष (रू.एक कोटी सत्तावीस लक्ष फक्त) निधी **मागणी क्र.डी-३,२४०१, पीक संवर्धन,१०९ विस्तार व प्रशिक्षण,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनातंर्गत योजना, (०१) (४७) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, (२४०१ २६४९) ३१-सहाय्यक अनुदान** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१८-१९ च्या मंजुर निधीतुन भागविण्यात यावा.

५ सदर वितरीत निधीच्या अंतर्गत झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाकडे सादर करण्याची कार्यवाही संचालक (आत्मा) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी करावी.

६ हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपाचारिक संदर्भ क्र.३३२/इमा-२, दि.२८.६.२०१८, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१०३/१४३१,दि.७.८.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेच्या तसेच व्यय अग्रक्रम समितीने चक्रीय पद्धतीनुसार दिलेल्या मान्यतेच्या अधिन राहून निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१७१३३७३१५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2018.10.17 13:45:56 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त (कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
६. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० जादा प्रतींसह)
७. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
९. सर्व विभागीय कृषी सह संचालक,
१०. कृषि सह संचालक ( विस्तार), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१२. प्राचार्य, सर्व रामेती, महाराष्ट्र राज्य, पुणे ( पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, नागपूर व खोपोली )
१३. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१४. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-३२
१५. नियोजन विभाग का.१४३२, मंत्रालय, मुंबई-३२
१६. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२ अे, मंत्रालय, मुंबई-३२
१७. कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२१. निवड नस्ती.३अे.

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांकः संकीर्ण २०१८/प्र.क्र. ९७ /३-अे, दिनांक : १७ ऑक्टोंबर, २०१८ सोबतचे प्रपत्र**

**प्रपत्र अ**

| अ.क्र. | बाब | मुळ प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत | सुधारित प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत |
|---|---|---|---|
| **अ)** | **स्थापत्य ( विद्युत व पाणीपुरवठा सोडून सर्व )** | | |
| १) | बांधकाम खर्च | रु.२,२८,१०,९१२ | रु.२,४८,८३,०१८ |
| २) | सभागृहातील खुर्च्या | रु. २१,९८,००० | रु.२९,१०,५६४ |
| ३) | ग्रीन रुम, स्टेज फ़र्निचर व पडदे | रु.१०,००,००० | रु.१४,९८,११६ |
| ४) | अकॉस्टिकल ट्रिटमेंट व मुरल | रु.२६,००,००० | रु.२१,८१,३१९ |
| ५) | अंतर्गत रस्ते व पाथवेज | रु. ५,००,००० | रु. ९३,४१,४७१ |
| ६) | परिसर सुशोभिकरण | रु. ५,००,००० | - |
| ७) | अग्निशमन उपाययोजना | रु.१६,६४,००० | रु. १५,९५,५१५ |
| ८) | रेन वॉटर हार्वेस्टिंग | रु.२,१०,००० | रु. ७२,९०० |
| ९) | क्वालिटी कन्ट्रोंल व टेस्टिंग | रु.१,१४,०५५ | - |
| १०) | महानगरपालिका नागपूर शुल्क | रु. १२,४८,००० | रु. ३,६०,००० |
| ११) | आर्किटेक्चरल चार्जेस | रु. १२,३८,२६४ | रु.१५,४५,०८७ |
| १२) | तांत्रिक तपासणी फ़ी | रु.५,६४,२७३ | रु. ५,६४,२७३ |
| १३) | आकस्मिक खर्च | रु. १८,०५,६७४ | रु.११,७१,८४४ |
| ब) | **विद्युत** | | |
| १) | अंतर्गत विद्युतीकरण | रु. ३२,००,००० | रु.२३,९६,७८८ |
| २) | वातानुकुलित यंत्रणा | रु.३०,००,००० | रु. ५५,५८,४१३ |
| ३) | बाह्य विद्युतीकरण | रु. ५,००,००० | रु.३,०४,६३७ |
| ४) | ट्रान्सफ़ार्मरचा दर्जा वाढविणे | रु.१०,००,००० | - |
| ५) | डिजेल जनरेटर सेट | रु.२३,२०,००० | रु.१४,७१,८७३ |
| ६) | १)पी. अे / ऑडिओ , व्हिडिओ सिस्टीम | रु.१७,००,००० | रु.५७,५५,९८० |
| | २)नवीन बाबी | रु.११७२०००० | रु.१५४८७६९१ |
| **क)** | **पाणीपुरवठा मुळ बाबी** | | |
| १) | बाह्य पाणी पुरवठा | रु,१८,२४,८७३ | रु.९,९०,६८५ |
| | **एकुण** | रु.४,९९,९८,०५१ | रु.६,२६,०२,०८३ |